पिकांच्या परिस्थितीचा आढावा घेण्यासंदर्भात आधुनिक तंत्रज्ञानाच्या वापराबाबत अभ्यास करण्यासाठी समिती गठित करणे ..

महाराष्ट्र शासन

नियोजन विभाग

शासन निर्णय क्रमांकः सुसंके-२०१४/प्र.क्र.९३/का.१४१८

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय, मुंबई-४०००३२.

दिनांक : ३१ मार्च, २०१५

प्रस्तावना :

उपग्रहांद्वारे प्राप्त होणा-या पृथ्वीच्या छायाचित्रांचे विश्लेषण सुदूर संवेदन तंत्रज्ञान (Remote Sensing) या अत्याधुनिक व प्रगत तंत्रज्ञानाच्या सहाय्याने करुन नैसर्गिक साधन संपत्तीचा विकास जलद गतीने करणे शक्य झाले आहे. यासाठी शासनाने या विभागाच्या अधिपत्याखाली महाराष्ट्र सुदूर संवेदन उपयोजन केंद्राची स्थापना नागपूर येथे केली आहे. सुदूर संवेदन तंत्रज्ञानाची वृद्धी व योग्य वापर करणे व त्या अनुरोधाने सल्ला देण्याचे कार्य सदर केंद्राकडून केले जात आहे. सदर संस्थेचे कामकाज विचारात घेता शासनाच्या कृषि विभाग व महाराष्ट्र सुदूर संवेदन उपयोजन केंद्र, नागपूर यांचा संयुक्त उपक्रम म्हणून विविध पिकांच्या परिस्थितीचा आढावा घेण्यासंदर्भात आधुनिक तंत्रज्ञानाचा वापर करणे शक्य आहे किंवा कसे, याचा अभ्यास करण्यासाठी मा. अपर मुख्य सचिव (कृषि) यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:

२. विविध पिकांच्या परिस्थितीचा आढावा घेण्यासंदर्भात आधुनिक तंत्रज्ञानाच्या वापराबाबत अभ्यास करण्यासाठी खालीलप्रमाणे समिती गठित करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १. | अपर मुख्य सचिव (कृषि) | - अध्यक्ष |
| २. | प्रधान सचिव (महसूल) | - सदस्य |
| ३. | प्रधान सचिव (माहीती व तंत्रज्ञान) | - सदस्य |
| ४. | सचिव (मदत व पुनर्वसन),महसूल व वन विभाग | - सदस्य |
| ५. | आयुक्त, (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे | - सदस्य |
| ६. | संचालक, (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, पुणे | - सदस्य |
| ७. | संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, पुणे | - सदस्य |
| ८. | उपसचिव, नियोजन , मंत्रालय, मुंबई | - सदस्य |
| ९. | संचालक, MRSAC,नागपूर | - सदस्य सचिव |

३. वरील समितीमध्ये तांत्रिक सहाय्य करण्यासाठी आवश्यकतेनुसार या क्षेत्रातील शास्त्रज्ञ / तज्ञ व्यक्तिंना निमंत्रित सदस्य म्हणुन घेता येईल.

४. समितीची कार्यकक्षा:-

- राज्यातील विविध पिकांच्या परिस्थितीचा आढावा घेण्यासंदर्भात आधुनिक तंत्रज्ञानाच्या वापराबाबत अभ्यास करणे.
- राज्यातील कृषी दुष्काळाबाबत अभ्यास करण्यासाठी आधुनिक तंत्रज्ञानाचा वापर करणे.
- ह्या आभ्यासांतर्गत प्रायोगिक तत्वावर विविंध पिकांकरिता सुदूर सवेंदन, कृषि व हवामान विषयक उपलब्ध असलेल्या तंत्रज्ञानाचा एकत्रितरित्या अभ्यास.
- अभ्यास निष्कर्षानुसार, राज्यातील विविध पिक परिस्थितीच्या आकलनाकरिता नवीन तंत्रज्ञान विकसित करण्याबाबत आवश्यक प्रस्ताव सादर करणे.

५. वरील गठीत केलेल्या समितीने आपला अहवाल लवकरात लवकर शासनास सादर करावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०१५०३२६१७१४२६०९१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arunkumar S Belgudri

Digitally signed by Arunkumar S Belgudri
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Arunkumar S Belgudri
Date: 2015.04.01 11:44:34 +05'30'

**(अ.शि.बेळगुद्री)**
शासनाचे उप सचिव

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव
२) मा. मुख्यमंत्री यांचे सचिव
३) मा. मंत्री / राज्यमंत्री, यांचे खाजगी सचिव
४) शासनाचे मुख्य सचिव
५) शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/सचिव

६) अपर मुख्य सचिव (महसूल)

७) अपर मुख्य सचिव (माहीती व तंत्रज्ञान)

८) आयुक्त, (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे

९) सचिव(मदत व पुनर्वसन)

१०) संचालक, (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, पुणे

११) संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, पुणे

१२) सर्व मंत्रालयीन विभाग

१३) विभागीय आयुक्त, (सर्व)

१४) जिल्हाधिकारी, (सर्व)

१५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद(सर्व)

१६) संचालक, महाराष्ट्र सुदूर सवेंदन उपयोजन केंद्र, नागपूर, व्हीएनआयटी परिसर, दक्षिण अंबाझरी रोड, नागपूर-४४० ०११

१७) उपसचिव, का. १४१८, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई

१८) निवड नस्ती (का.१४१८), नियोजन विभाग

**********